**महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला अंतर्गत अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते “माफसुअर्थ” या कस्टमाईज्ड संगणकीय प्रणाली मार्फत तयार करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलव्हीएस-२०१५/ प्र.क्र. १२९/ पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**तारीख: १३ ऑगस्ट, २०१५.**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र. सीडीएस-१०/२००१/(प्र.क्र.५९)/पदुम-४ दि. २ एप्रिल, २००२.
२) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र. सीडीएस-१०/२००१/(प्र.क्र.५९)/पदुम-४ दि. ७ जून, २००३.
३) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र.पसंप्र१००१/प्र.क्र.२९/(भाग-४)/पदुम-१ दि. २५ मे, २००५.
४) शासन निर्णय क्रमांकः पुरकपत्र क्रमांक पसंप्र१००४/प्र.क्र.२६२/पदुम-१ दि. ३० जून, २००५.
५) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग क्र.मपवि-२०१२/प्र.क्र.४२२/पदुम-१ दि. २४ डिसेंबर, २०१२.
६) शासन निर्णय क्रमांकः परिपत्रक वित्त विभाग क्रमांक संकीर्ण -१०११/प्र.क्र.१००/कोषा प्र-५ दि. ०७ मार्च, २०१५.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ,अकोला अंतर्गत असलेले मंडळाचे मुख्यालय, तीन गोठीत रेत प्रयोगशाळा, दोन वळू संगोपन केंद्रे व सात वळू माता प्रक्षेत्रे येथील अधिकारी व कर्मचारी यांना वेतन व भत्ते याबाबतचे प्रदान शासनामार्फत संकेतांक क्र. २४०३ २२८ ८ अंतर्गत ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबीखाली अदा करण्यात येते. महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोलाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचारी यांना वेतन देयकाबाबतची सद्य:स्थितीतील कार्यपध्दती खालील प्रमाणे आहे.

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोलाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचारी यांना वेतन व भत्ते अदा करण्यासाठी मंडळास, शासनामार्फत सहाय्यक अनुदान दिले जाते. सदरचे सहाय्यक अनुदान बीडीएस वर वितरीत करण्यापुर्वी शासन निर्णय काढण्यात येतो व तद्नंतर सहाय्यक अनुदानाचा निधी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे संगणक वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येतो. सदरच्या शासन निर्णयाप्रमाणे महाराष्ट्र पशुधन विकास

मंडळ देयक तयार करून ते जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला यांचेकडे पाठविण्यात येते. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला हे सदरचा निधी अकोला कोषागार येथून आहरित करून त्याचे संवितरण करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून शासनामार्फत घोषित केलेले आहेत. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला हे सदरचे देयक अकोला कोषागारातून आहरण करून सदर रक्कमेचा धनादेश मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचे नावे देतात. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला हे सदरचा धनादेश मंडळाच्या खात्यात जमा करून , मंडळांतर्गत असलेले मंडळाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त असलेल्या विविध संस्थांचे प्रमुख यांच्याकडे वेतन व भत्त्यासाठीचा निधी आरटीजीएसद्वारे वितरीत करतात. मंडळाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त विविध संस्थांचे कार्यालय प्रमुख हे त्या त्या संबंधित कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन देयक तयार करून धनादेशाद्वारे बँकेमार्फत अधिकारी व कर्मचारी यांच्या बँक खात्यात वेतनाची रक्कम जमा केली जाते. वाचा -६ येथील शासन परिपत्रक दिनांक ०७ मार्च, २०१५ अन्वये कृषि,पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग या विभागाच्या अधिपत्याखालील संस्थांमधील कर्मचाऱ्यांची माहे मार्च, २०१५ (एप्रिल, २०१५ देय) पासून वेतनासाठी अनुदानाची देयकें प्रणालीमार्फत तयार करून कोषागारात सादर करावे, असे सुचित केल्यामुळे व ही बाब अनिवार्य केल्यामुळे आता या पुढे महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचे अधिनस्त सर्व संस्थांमध्ये कार्यरत सर्व अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते कृषि, पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा वाचा-५ येथील शासन निर्णय दि. २४ डिसेंबर, २०१२ अन्वये माफसुअर्थ या संगणकीय प्रणालीद्वारे अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने, पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला अंतर्गत कार्यरत असलेले मंडळाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त असलेल्या संस्थांमधील अधिकारी व कर्मचारी यांची वेतन देयके “माफसुअर्थ” या संगणकीय प्रणालीमार्फत काढण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे. मंडळाने त्यांचे मुख्यालय व अधिनस्त विविध संस्थेमध्ये कार्यरत असलेले सर्व अधिकारी व कर्मचारी यांची माहे ऑगस्ट, २०१५ चे माहे, सप्टेंबर, २०१५ मध्ये देय असलेले वेतन व भत्ते व यापुढील सर्व वेतन देयके या संगणकीय प्रणालीद्वारे काढण्यांत यावी. महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला या संस्थेचे व अधिनस्त कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन २४०३ - पशुसंवर्धन, १०२- पशु व महिष विकास, (०६) (०२) महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाची स्थापना ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन), योजनेत्तर योजना (संकेतांक २४०३ २२८८) या लेखाशीर्षाखाली कोषागार अकोला येथून सहाय्यक अनुदानातून काढण्याच्या प्रयोजनार्थ यापुढे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला हे पुर्वीप्रमाणेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. या प्रयोजनार्थ महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गत मंडळाचे मुख्यालय अकोला येथील प्रशासन अधिकारी, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, औरंगाबाद,नागपूर येथील संबधीत विभागीय व्यवस्थापक, वळू संगोपन केंद्र, औरंगाबाद, नागपूर

येथील व्यवस्थापक व वळू माता प्रक्षेत्र पोहरा, वडसा, हिंगोली, कोपरगांव, जत, जुनोनी, ताथवडे येथील संबधित प्रक्षेत्र व्यवस्थापक हे आहरण व संवितरण अधिकारी स्तर-१ (DDO Level-I) म्हणून काम पाहतील. ते त्यांच्या कार्यालयातील अधिकारी व कर्मचाऱ्यांची दरमहाची वेतन व भत्याची देयके / बदलाची पत्रके (Change Statements) "माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीवर तयार करून व त्या संबंधित समर्थनीय कागदपत्रे जोडून प्रत्येक महिन्याचे वेतन देयक तयार करतील व त्याची मुद्रित प्रत काढून, त्यावर स्वाक्षरी करून , कार्यालयाचा शिक्का उमटवून सदर देयक मुद्रित प्रतीसह उपरोक्त प्रणालीवर उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी स्तर-२ (DDO Level-II) म्हणून पाठवतील. उपआयुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला (DDO Level-II) उपरोक्त प्रणालीवर तसेच, मुद्रित प्रतीमध्ये वेतन देयके प्राप्त झाल्यानंतर, ती प्रणालीवर उपलब्ध असलेल्या वेतन देयकासोबत तपासतील आणि योग्य नसल्यास अशी देयके संबंधित कार्यालय प्रमुखांकडे त्रुटींची पुर्तता करण्यासाठी परत करतील. त्रुटींची पुर्तता केलेली वेतन व भत्याची देयके प्राप्त झाल्यानंतर ती तपासून जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला यांना सादर (Forward) करतील. "माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीद्वारे प्राप्त झालेली सदरची वेतन व भत्यांची देयके जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला हे आहरण व संवितरण अधिकारी स्तर-३ (DDO Level-III) म्हणून योजना व संकेतांकनिहाय देयके एकत्रित करून त्याप्रित्यर्थ महाराष्ट्र कोषागार नियम क्र. ४४ मध्ये एकत्रित एक देयक तयार करून ते कोषागारात प्रदानाकरिता सादर करतील. सदरचे देयक कोषागारातून आहरित झाल्यानंतर या देयकास "माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीवर मंजूरी देण्याचे प्राधिकार हे जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त अकोला यांना राहतील. उपरोक्त नमुद केलेल्या "म्हापसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये सोपविण्यात आलेल्या कामकाजाचा पदनिहाय स्तर दर्शविणारा तक्ता सोबत परिशिष्ट अ मध्ये जोडण्यात आलेला आहे. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला यांनी सादर केलेल्या देयकातून कोषागार अधिकारी, अकोला हे शासनाच्या कपाती वजा करून , निव्वळ देय होणारी रक्कम थेट ECS द्वारे, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला यांच्या खात्यात संवितरणासाठी जमा करतील. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, अकोला हे त्यांना प्राप्त झालेल्या रकमेतुन त्यांच्या स्तरावर करण्यात येणाऱ्या अशासकीय वसुलीची रक्कम वजा करून त्यांचे लेखे त्यांच्या स्तरावर परिरक्षित करतील व उर्वरीत वेतनाची रक्कम संबधित कर्मचाऱ्यांच्या खात्यात जमा करतील. तसेच सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनातुन वसुल करण्यात आलेल्या वसुलीच्या तपशीलाची अनुसुची उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला (DDO Level-II) यांना सादर करतील. "माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचाऱ्यांबाबतची आवश्यक ती सर्व माहिती भरण्याचे (Data Entry) काम पूर्ण करून घेण्याची जबाबदारी खालीलप्रमाणे सोपविण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ** | **वेतन देयकाकरिता आवश्यक ती सर्व माहिती भरण्यासाठी (Data Entry) प्राथमिक जबाबदार अधिकारी** | **या संपूर्ण कामाची पडताळणी करून मंजुरी देणारा प्राधिकारी (निवृत्तीवेतन योजना लागू असलेले कर्मचारी)** | **या संपूर्ण कामाकरिता मंजुरी देणारा प्राधिकारी (परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेले कर्मचारी)** | **संपूर्ण काम पूर्ण करून घेणारा अधिकारी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ मुख्यालय | प्रशासन अधिकारी | उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला | मुख्य कार्यकारी अधिकारी. |
| २ | गोठीत रेत प्रयोगशाळा | विभागीय व्यवस्थापक | उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला | मुख्य कार्यकारी अधिकारी. |
| ३ | वळू माता प्रक्षेत्र | प्रक्षेत्र व्यवस्थापक | उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला | मुख्य कार्यकारी अधिकारी. |
| ४ | वळू संगोपन केंद्र | व्यवस्थापक | उपायुक्त पशुसंवर्धन तथा कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला | मुख्य कार्यकारी अधिकारी |

"माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गत असलेले मंडळाचे मुख्यालय व अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचाऱ्यांबाबतची आवश्यक ती सर्व माहिती वरील रकाना क्र. ३ मध्ये दर्शविलेले आहरण व संवितरण अधिकारी स्तर-१ (DDO Level-I) यांनी भरुन सही व शिक्क्यानिशी वरील रकाना क्र. ४ व ५ मधिल जबाबदार अधिकाऱ्यांकडे सादर करतील. वरील रकाना क्र. ४ व ५ मधिल जबाबदार अधिकाऱ्यांनी सदर माहितीची पडताळणी करून तशी मंजुरी (APPROVAL) देतील. माफसुअर्थ या संगणकीय प्रणालीमध्ये महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गत असलेले मंडळाचे मुख्यालय व अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व

कर्मचाऱ्यांबाबतची आवश्यक ती संपूर्ण माहिती विहीत मुदतीत पूर्ण भरण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांची राहील. "माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये भरलेली माहिती ही अंतिम असेल. त्यामध्ये पुन्हा बदल करता येणार नाही. माहितीमध्ये बदल करावयाचा झाल्यास, तसा समर्थनात्मक प्रस्ताव शासनास सादर करावा. प्रस्तावित बदल आवश्यकतेप्रमाणे शासनस्तरावरुन केले जातील.महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गत असलेले मुख्यालय व अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचा-यांचे वेतन यापुढे इलेक्ट्रॅनिक पद्धतीने संबंधित कर्मचाऱ्यांच्या बँक खात्यात जमा होणार असल्याने, कर्मचाऱ्यांच्या बँक खात्याबद्दलची अधिकृत माहिती संबंधित प्रक्षेत्रे यांचेकडे असणे आवश्यक आहे. त्यामुळे, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ मुख्यालय व अधिनस्त विविध संस्था यांच्या कार्यालय प्रमुखांनी "परिशिष्ट-ब" मध्ये दर्शविल्यानुसार सर्व कर्मचाऱ्यांकडून आवश्यक ते प्रमाणपत्र त्यांच्या स्वाक्षरीसह प्राप्त करून घ्यावे व ते संग्रही ठेवावे. तसेच, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ मुख्यालय व अधिनस्त संस्था यांच्या कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या अखत्यारितील कर्मचाऱ्यांचे "परिशिष्ट-ब" मधील प्रमाणपत्र प्राप्त करून घेऊन ते संग्रही ठेवण्यात आल्याचे "परिशिष्ट-क" नुसार प्रमाणपत्र कोषाध्यक्ष, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांना सादर करतील."माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये माहिती भरल्यानंतर उपरोक्त परिच्छेद क्र. ३ मधील महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गत असलेले मुख्यालय अधिनस्त विविध संस्थेमधील अधिकारी व कर्मचाऱ्यांबाबतची आवश्यक ती सर्व माहिती संस्था प्रमुखांनी भरुन सही व शिक्क्यानिशी प्रशासन अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ अकोला यांचेकडे सादर करतील प्रशासन अधिकारी,महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी प्राप्त झालेली माहितीची मुद्रीत प्रत, उपलब्ध असलेल्या कागदपत्रावरुन पडताळणी करून कोषाध्यक्ष महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचेकडे सादर करतील. सदर माहिती भरणे व त्याची पडताळणी करण्याची कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ पर्यत पूर्ण करण्यात यावी. उपरोक्त परिच्छेदामधील तक्त्यातील क्र. ४ या रकान्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांनी प्रणालीतून तयार होणारे प्रमाणपत्र मुद्रित करून घेतील व त्यावर स्वाक्षरी करून कार्यालयीन शिक्का उमटवून ते रकाना क्र. ५ मधील अधिकाऱ्याकडे सादर करतील. रकाना क्र. ५ मधील अधिकारी यांनी त्याची एक प्रत स्वत:कडे ठेऊन दुसरी प्रत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचेकडे सादर करतील. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी त्याची एक प्रत स्वत:कडे ठेऊन दुसरी प्रत शासनास सादर करतील. महाराष्ट्र पशुधन मंडळांतर्गत असलेले मुख्यालय व अधिनस्त विविध संस्थेमधील दि. ०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आलेली आहे. सदर परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कर्मचाऱ्यांच्या वेतनातून करावयाच्या वसुलीबाबत तसेच नियोक्त्याचे अंशदानाबाबत अंमलात आणावयाच्या कार्यपद्धतीबाबतचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल. "माफसुअर्थ" या प्रणालीत माहिती भरणे, सदर प्रणाली हाताळणे आणि त्याद्वारे वेतन देयक तयार करणे इ. बाबत प्रशिक्षण देण्याकरिता मास्टर ट्रेनर्सची निवड मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी करावी. सदर मास्टर ट्रेनर्सला प्रथम टप्प्यात मे. टाटा कन्सल्टन्सी सर्व्हिसेस यांच्या कर्मचाऱ्यांकडून सर्वसमावेशक प्रशिक्षण देण्यात

येईल. मास्टर ट्रेनर्सनी पुढे त्यांच्या कार्यक्षेत्रातील गोठीत रेत प्रयोगशाळा, वळू संगोपन केंद्र, वळू माता प्रक्षेत्र येथील संबंधित कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याची कार्यवाही करावी. याबाबतचा सविस्तर कार्यक्रम मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी तयार करून त्याप्रमाणे कार्यवाही करावी. कोणत्याही परिस्थितीत मास्टर ट्रेनर्सचे प्रशिक्षण आणि त्या पुढील प्रशिक्षण हे दोन्ही टप्पे दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ पर्यत पूर्ण होणे आवश्यक आहे. या योजनेवर संनियंत्रण ठेवणे आणि ती परिणामकारकरित्या राबविण्याची जबाबदारी पूर्णत: मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांची राहिल.माहे ऑगस्ट, २०१५ चे माहे सप्टेंबर, २०१५ मध्ये देय असलेले वेतन अदा करण्याकरिता “माफसुअर्थ” प्रणालीवर तयार केलेले वेतन देयक हाताने तयार केलेल्या वेतन देयकाबरोबर सध्याच्या प्रचलित कार्यप्रणाली प्रमाणे संबंधित कोषागार कार्यालयाकडे सादर करावे. मात्र, सध्याच्या कार्यपध्दतीनुसार तयार केलेले वेतन देयक “माफसुअर्थ” प्रणालीवर तयार करण्यात आलेल्या देयकासोबत सादर केल्याशिवाय संबंधित कोषागार कार्यालयाकडून स्वीकारले जाणार नाही. माहे सप्टेंबर, २०१५ चे माहे ऑक्टोंबर, २०१५ मध्ये देय असलेल्या वेतनापासून मात्र केवळ प्रणालीद्वारे तयार करण्यात आलेले देयकच कोषागारात सादर करावे. कोषागारांनी नमुना ४४ मधील देयके स्वीकारतांना या संदर्भात खात्री करून च देयके स्वीकारावीत.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक१९३/१५/कोषा-५, दिनांक १३/०८/२०१५ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१४१६४०३०४१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Machindra Apparao Pachpinde

Digitally signed by Machindra Apparao Pachpinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a6acbdcfb816875075a31b7754a1ac8c55c206e2845f9145cd34b586d977a703, cn=Machindra Apparao Pachpinde
Date: 2015.08.14 16:55:27 +05'30'

**( डॉ.एम.ए.पाचपिंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (पदुम) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (पशुसंवर्धन) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक
६. सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

७. सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-७
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ,अकोला
११.प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, अमरावती,नागपूर,लातूर,औरंगाबाद,नाशिक,पुणे
१२.जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला, अमरावती, नागपूर,गडचिरोली, हिंगोली, अहमदनगर, औरंगाबाद, सांगली,सोलापूर व पुणे
१३.विभागीय व्यवस्थापक,गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, औरंगाबाद व नागपूर
१४.व्यवस्थापक,वळू संगोपन केंद्र, औरंगाबाद व नागपूर
१५.प्रक्षेत्र व्यवस्थापक, वळू माता प्रक्षेत्र,पोहरा,वडसा,हिंगोली,कोपरगांव,जत,जुनोनी व ताथवडे
१६.सर्व कार्यासने, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.महालेखापाल, (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), २/१, महाराष्ट्र मुंबई/नागपुर
१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१९.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, अमरावती, नागपूर, गडचिरोली, हिंगोली, अहमदनगर, औरंगाबाद, सांगली, सोलापूर व पुणे
२०.निवड नस्ती (पदुम-४)

**परिशिष्ट - अ**

"माफसुअर्थ" या संगणकीय प्रणालीमध्ये सोपविण्यात आलेल्या कामकाजाचा
पदनिहाय स्तर दर्शविणारा तक्ता



**परिशिष्ट - ब**

**प्रमाणपत्र**

मी---------------------------------------------------------------- (नांव) ---------------------------- (पदनाम), याद्वारे प्रमाणित करतो / करते की, माझे मासिक वेतन तसेच इतर भत्ते यांचे प्रदान मला इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेट माझ्या बॅक खात्यात जमा करण्यात येणार असल्याने आजपासून यापूढे ज्या दिवशी अशा प्रकारे माझे मासिक वेतन तसेच इतर भत्ते यांचे प्रदान मला इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेट माझ्या बॅक खात्यात जमा करण्यात येतील त्या दिवशी ते मला प्राप्त झाले असे समजण्यात येईल. याबाबत माझी कोणत्याही प्रकारची हरकत अथवा आक्षेप राहणार नाही. माझे मासिक वेतन तसेच इतर भत्ते यांचे प्रदान मला इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेट माझ्या खाली नमूद केलेल्या बॅक खात्यात जमा करण्यात यावे.

बॅकेचे नांव :- ------------------------------------------------
शाखेचे नांव व पत्ता :- ------------------------------------------------
बचत खाते क्रमांक :- ------------------------------------------------
एमआयसीआर कोड :- ------------------------------------------------
आयएफएससी कोड :- ------------------------------------------------

दिनांक :-

सही /-
(कर्मचाऱ्याचे नांव)

(पदनाम)
कार्यालयाचा पत्ता

**परिशिष्ट - क**

**प्रमाणपत्र**

संस्थेचे नांव व पूर्ण पत्ता :- -----------------------------------------------

कार्यालय प्रमुखाचे नांव :- ----------------------------------------------

प्रमाणित करण्यात येते की, माझ्या ------------------------------------------------ संस्थेतील सर्व अधिकारी / कर्मचारी यांचेकडून शासन निर्णय क्र एलव्हीएसक्र.प्र /२०१५-.१२९/पदुम-४ दिनांक १३ ऑगस्ट, २०१५ सोबतच्या "परिशिष्ट - अ" मध्ये नेमून दिलेले बॅकखात्या संबंधीचे प्रमाणपत्र प्राप्त करून ते संग्रही ठेवण्यात आले आहे.

दिनांक :-

सही /-

(नांव -----------------------)

(पदनाम)